**<u>भूसंपादन आस्थापना - नाशिक</u>**
**आयुक्त, नाशिक विभाग यांच्या कार्यालयातील तसेच नाशिक विभागातील भूसंपादन आस्थापनेवरील अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०१८/प्र.क्र.८/अ-३**
(E-Office No. 673685)
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक-१७ एप्रिल, २०२५.

**वाचा -** १) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्रमांक : संकीर्ण -२०१८/प्र.क्र.८/अ-३, दि.२३.१०.२०२४.
२) वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक : पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०३.०३.२०२५.
३) विभागीय आयुक्त, नाशिक यांचे पत्र क्र.भूसं.क्र.१/२०२५,दि.२६.०३.२०२५.

**<u>प्रस्तावना :-</u>**

वित्त विभाग, शासन निर्णय दि.०३.०३.२०२५ अन्वये, दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ या कालावधी करीता अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत प्रशासकीय विभागांना अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत.

विभागीय आयुक्त, नाशिक यांचे दि.२६.०३.२०२५ रोजीच्या पत्रान्वये, त्यांच्या अधिनस्त असलेल्या भूसंपादन कार्यालयातील अस्थायी पदांना मुदतवाढ देणेबाबत विनंती केली आहे. यापूर्वी उपरोक्त संदर्भाधीन क्र.१ येथील दि.२३.१०.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये दि.०१.०९.२०२४ ते दि.२८.०२.२०२५ पर्यंत अस्थायी पदांना मुदतवाढ प्रदान करण्यात आलेली आहे. त्याच धर्तीवर भूसंपादन कार्यालयामध्ये कार्यरत पदांचा आकृतीबंध निश्चित झालेला नसल्यामुळे वित्त विभागाने प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करुन विभागीय आयुक्त, नाशिक यांचे अधिनस्त विभागातील भूसंपादन कार्यालयातील अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**<u>शासन निर्णय -</u>**

उपरोक्त संदर्भाधीन क्र.१ येथील दि.२३.१०.२०२४ रोजीच्या शासन निर्णय अन्वये नाशिक विभागातील विभागीय आयुक्त कार्यालय तसेच नाशिक, अहमदनगर, जळगाव व धुळे या जिल्ह्यातील भूसंपादन कामी कार्यरत असलेल्या पथकातील एकूण ९३ अस्थायी पदांना दि.०१.०९.२०२४ ते दि.२८.०२.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली होती. सोबत जोडलेल्या

तक्ता (अ) मध्ये दर्शविलेली सदर एकूण ९३ अस्थायी पदे दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत चालू ठेवण्यास पुढील अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे-

**१)** अतिरिक्त ठरविण्यात आलेल्या पदावरील अधिकारी / कर्मचारी यांना विभागामार्फत रिक्त पदावर सामावून घेण्यात आले आहे अथवा वित्त विभागाकडील अतिरिक्त संवर्ग कक्षाकडे वर्ग करण्यात आले आहे.

**२)** अतिरिक्त ठरविण्यात आलेल्या पदांवरील कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्ते यांचे प्रदान कोणत्याही परिस्थितीत विभागातील कायम / स्थायी, अस्थायी पदांसाठीच्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून करण्यात येत नाही.

**३)** प्रस्तावाधीन प्रकरणामध्ये मुदतवाढ प्रस्तावित करण्यात आलेल्या पदांपैकी काही पदे ६ महिन्यांपेक्षा अधिक कालावधीसाठी रिक्त आहेत अथवा अतिरिक्त कार्यभाराने चालू असल्याचे निदर्शनास आले आहे. विभागीय आयुक्त आणि जिल्हाधिकारी यांनी सदरच्या पदांची नमूद केलेली अत्यावश्यकता विचारात घेता, सदर रिक्त पदे तात्काळ भरण्याच्या अटींवर मुदतवाढ देण्यात येत आहे. सदर शासन निर्णयातील तरतूदीस विसंगत कार्यवाही करण्यात आल्यास व त्यामुळे काही अडचणी उद्भवल्यास त्यास संबंधित कार्यालय जबाबदार राहील.

**४)** सदर अस्थायी पदांच्या वेतनाचा खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

**५)** सदर पदांचा अस्थायी पदांच्या आढाव्यामध्ये समावेश आहे.

**०२.** ही सर्व पदे संबंधित विभागाच्या स्थायी संवर्गातील तात्पुरती भर म्हणून समजण्यात यावी.

**०३.** सदरहू पदांवरील पदधारक शासनाच्या वेळोवेळी निघालेल्या आदेशांप्रमाणे महागाई भत्ता व इतर पूरक भत्ते मिळण्यास पात्र राहतील.

**०४.** वरील सर्व पदांवर / पथकांवर होणारा खर्च आवश्यकतेनुसार मागणी क्र. सी-१-मुख्य लेखाशीर्ष २०२९ जमीन महसूल- (००) ००१ संचालन व प्रशासन - (०१) भूमी संपादन आस्थापना (योजनेतर) - (०१)(०२) आयुक्त, नाशिक -०१ वेतन (२०२९००६४) व (०२) भूमिसंपादन आस्थापना (योजनांतर्गत) - (०२) (०२) आयुक्त, नाशिक- ०१ वेतन (२०२९०२०६ ) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून तो सन २०२५- २०२६ या आर्थिक वर्षासाठी मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा व प्रत्यक्ष खर्च वर्षाअखेरीस संबंधित संपादक विभागाकडे (महसूल व वन विभागाखेरीज) वर्ग करण्यात यावा.

**०५.** सदर पदांच्या आवश्यकतेबाबत दि.३१.०८.२०२५ पूर्वी आढावा पूर्ण करण्याच्या अधीन राहून सदर मान्यता देण्यात येत आहे.

**०६.** सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०३.०३.२०२५ अन्वये प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

विभागीय आयुक्त, नाशिक यांनी त्यांच्या आस्थापनेवरील व नियंत्रणाखालील कार्यालयांच्या आस्थापनेवरील मंजूर पदांचा आढावा घ्यावा. पदांचा आढावा घेताना शासनाच्या कार्यपध्दतीतील तंत्रज्ञानाचा वाढता वापर, काळानुरुप शासनाच्या मुनष्यबळात बदल व मनुष्यबळाच्या परिणामकारक वापराची आवश्यकता या बाबींचा विचार करुन अनावश्यक पदे कमी करण्याचाही विचार करावा. दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ या कालावधीमध्ये आढाव्यास (नव्याने निर्माण केलेल्या पदांसह) उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेऊन सुधारित आकृतिबंध निश्चित करणे आवश्यक आहे. सबब, त्याबाबतचे प्रस्ताव विहित कालावधीत शासनास सादर करण्याची कार्यवाही करावी. अन्यथा, मुदतवाढीअभावी सदर अस्थायी पदांच्या वेतनाचा प्रश्न उद्भवल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी आपल्या कार्यालयाची राहील याची नोंद घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२५०४१७१४४८४५३११९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MANE VASANT GOPAL

Digitally signed by MANE VASANT GOPAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Revenue and Forest Department, 2.5.4.20=19c1f05a32104713094b1babbae721a60140a8f1f9e16ca9d8dc3eaf7de15d65, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=c621b4190e31904b3dea97e81c85a31bbaaff04c1adea8a8811d74f01da4e724, cn=MANE VASANT GOPAL
Date: 2025.04.17 14:50:58 +05'30'

**( डॉ. वसंत माने )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**सोबत : तक्ता-अ**

**प्रति,**

१) प्रधान महालेखापाल - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२) विभागीय आयुक्त,नाशिक विभाग, नाशिक
३) जिल्हाधिकारी, नाशिक,धुळे, जळगाव, अहमदनगर, नंदुरबार
४) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक,धुळे,जळगाव,अहमदनगर,नंदुरबार
५) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
६) जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७) वित्त विभाग ( व्यय-९/ अर्थसंकल्प-३ व ४ / वित्तीय सुधारणा-१)
८) नियोजन विभाग
९) सार्वजनिक बांधकाम विभाग/ जलसंपदा विभाग / नगरविकास विभाग
१०) ब-१,ई-१,ई-३,अ-१, अ-२, अ-४ कार्यासने, महसूल व वन विभाग
११) निवड नस्ती

## प्रपत्र अ

महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्रमांक: संकिर्ण-२०१८/प्र.क्र.०८/अ-३, दि.१७.०४.२०२५ सोबतचा तक्ता

| अ. क्र. | जिल्हा | वि.भू.सं.अ. यांची एकूण पथक | कर्मचारी निहाय पदसंख्या | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | विशेष भूसंपादन अधिकारी | अ.का./उप लेखापाल | महसूल सहायक | मंडळ अधिकारी | शिपाई/ पहारेकरी | एकूण |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| १ | नाशिक | ५ | ५ | ५ | ८ | ५ | १२ | ३५ |
| २ | धुळे | ३ | ३ | २ | २ | ३ | ५ | १५ |
| ३ | जळगाव | २ | २ | १ | १ | २ | ४ | १० |
| ४ | अहमदनगर | ४ | ४ | ८ | ७ | ३ | ८ | ३० |
| एकूण पदे | | १४ | १४ | १६ | १८ | १३ | २९ | ९० |

**नाशिक विभागीय आयुक्त कार्यालयातील १ नायब तहसिलदार व २ अव्वल कारकून असे ३ व उक्त तक्त्यात नमूद ९० अशा एकूण ९३ अस्थायी पदे दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्यात येत आहे.**

MANE VASANT GOPAL

Digitally signed by MANE VASANT GOPAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Revenue and Forest Department, 2.5.4.20=19c1f05a32104713094b1babbae721a60140a8f1f9e16ca9d8dc3eaf7de15d65, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=c621b4190e31904b3dea97e81c85a31bbaaff04c1adea8a8811d74f01da4e724, cn=MANE VASANT GOPAL
Date: 2025.04.17 14:50:35 +05'30'

**( डॉ. वसंत माने )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**